सन २०१९-२० चा पुरवणी प्रकल्प अंमलबजावणी आराखडा (PIP)

**FMR Code 2.1.3.3**

**मांडवा ते गेटवे ऑफ इंडिया या सागरी मार्गावर प्रायोगिक तत्वावर Boat Ambulance cum Mobile Medical Unit ही सेवा बाह्य यंत्रणेकडून कार्यान्वित करण्यासाठी निविदा प्रक्रिया राबविणेस प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक आरोग्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-१२२०/प्र.क्र.०१/आरोग्य -७**

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.

**दिनांक : ७ ऑगस्ट, २०२०.**

वाचा :-

१. प्रकल्प संचालक ई.एम.एस. राष्ट्रीय आरोग्य अभियान,मुंबई यांचे पत्र क्र. राआसो/Boat Ambulance/प्रशासकिय मान्यता/९०७७८/२०२० दिनांक ०३ जानेवारी, २०२०.
२. आयुक्त (आरोग्य सेवा) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांची मंजूर टिप्पणी, दिनांक ३० डिसेंबर, २०१९.

**प्रस्तावना :-**

सन २०१९-२० चा पुरवणी प्रकल्प अंमलबजावणी आराखडा (PIP) या मध्ये वचनबद्ध ठेवलेल्या ( Committed) अनुदानातून मांडवा ते गेटवे ऑफ इंडिया या सागरी मार्गावर प्रायोगिक तत्वावर Boat Ambulance cum Mobile Medical Unit ही सेवा बाह्य यंत्रणेकडून कार्यान्वित करण्यासाठी निविदा प्रक्रिया राबविणेस प्रशासकीय मान्यता देण्याचा विषय शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

सन २०१९-२० चा पुरवणी प्रकल्प अंमलबजावणी आराखडा (PIP) या मध्ये वचनबद्ध ठेवलेल्या ( Committed) अनुदानातून मांडवा ते गेटवे ऑफ इंडिया या सागरी मार्गावर प्रायोगिक तत्वावर Boat Ambulance cum Mobile Medical Unit ही सेवा बाह्य यंत्रणेकडून कार्यान्वित करण्यासाठी निविदा प्रक्रिया राबविणेस प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदर प्रशासकीय मान्यता ही **प्रायोगिक तत्वावर एक वर्षासाठी** पुढील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.:-

१) Boat Ambulance cum Mobile Medical Unit ची सेवा बाह्य यंत्रणेकडून प्रस्तावित आहे.यामध्ये मेडिकल युनिट साठी लागणारी बोट,यंत्रसामुग्री,औषधे,कर्मचारीवर्ग,इंधनखर्च व इतर खर्च स्वत: बाह्य यंत्रणेने करावे व काम सुरु झाल्यावर प्रतिमहिना परिचालन खर्चाचे देयक (Opex) बाह्य यंत्रणेस अदा करण्यात यावे.

२) सदर बाबीची आवश्यकता / मागणी याची शहानिशा / खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच सदर बाबींच्या खरेदीसाठी निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

३) Boat ambulance cum Mobile Medical Unit साठी बाह्य संस्था निविदा प्रक्रियेद्वारे कार्यान्वित करण्यासाठी महाराष्ट सागरी मंडळाचे जलवाहतुकीचे नियम,जलयानांचे परवाने व या प्रकल्पासाठी समुचित त्या सर्व प्राधिकरणाच्या आवश्यक ते प्रचलीत अधिनियम,नियम व विनियम यांचे पालन करण्याची जबाबदारी यथास्थिती प्रकल्प संचालक (EMS),राष्ट्रीय आरोग्य अभियान,मुंबई व सम्बन्धित बाह्य यंत्रणा यांची राहील.

४) सदरहू बाबीचे विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ञांनी (तांत्रिक समिती / अधिकारी) यांनी मान्य केलेल्या विनिर्देशानुसार असावेत. तसेच, सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. पीआयपी मध्ये मंजूर असलेल्या बाबींच्या तांत्रिक विर्निदेशानुसार मागणीपत्र पाठविण्याची जबाबदारी संबंधीत कार्यक्रम प्रमुखांची राहिल. प्रस्तावातील समाविष्ट असलेल्या बाबींचीच निविदा प्रक्रिया करण्यात यावी.

५) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतूदीनुसार विहित खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

६) सदर सेवा बाह्य स्त्रोताद्वारे घेण्याबाबतचा दर निविदा प्रक्रीये अंती निश्चित करण्यात यावा.सदर दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबींचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे,त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

७) Boat Ambulance cum Mobile Medical Unit साठी बाह्यसेवा पुरवठादाराची निविड करतानांच्या निविदा दस्तऐवजात समाविष्ट करावयाच्या कामाचा गोषवारा व सेवेच्या अटी, शर्तींबाबतचे नियम आयुक्तालयाकडील अस्तित्वात असलेल्या निविदा दस्तऐवज छाननी समितीमार्फत अंतिम करुनच निविदा विषयक पुढील कार्यवाही करण्यात यावी.

८) राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत सन २०१९-२० या आर्थिक वर्षातील केंद्र शासनाने मंजूर केलेल्या पुरवणी कृती आराखडयामध्ये FMR Code २.१.३.३ या लेखाशिर्षांतर्गत रु १८९.०० लक्ष इतक्या मंजुर अनुदानाच्या विहित मर्यादेतच भागविण्यात यावा. सदरची बाब प्रशासकीय मंजुरीच्या विहित कालावधीत पूर्ण होईल याची दक्षता घ्यावी. याबाबतची संपूर्ण जबाबदारी कार्यक्रम प्रमुखांची राहील.

९) तसेच, या बाबींच्या खरेदी द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

१०) संपूर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

११) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/भाग-२/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अ.क्र.४ नियम क्र.७ समोरील स्तंभ क्र.६ येथील अटींची पूर्तता करण्यात यावी.

१२) खरेदी प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर खरेदी समितीच्या मान्यतेनंतरच पुरवठा आदेश निर्गमित करण्यात यावेत.

१३) सागरी वाहतुकीचे महाराष्ट्र सागर मंडळाचे नियम विचारात घेऊन प्रस्तावित रुग्णवाहिकेच्या संचालानाचा कालावधी निश्चित करून घेण्यात यावा व त्या प्रमाणे निविदा प्रक्रिया सागरी वाहतूक बंद असलेल्या कालावधीसाठी बाह्य यंत्रणेस परिचालन खर्च अनुन्ज्ञेय नसेल.

१४) सदर बोट ॲम्ब्युलन्स ही १०८ संदर्भ सेवेचाच एक भाग (Integral Part) म्हणून राहील, अशीही अट समाविष्ट करण्यात यावी.

१५) निविदा प्रक्रिया सुरु करण्यापुर्वी गुजरात अथवा देशाच्या अन्य राज्यातील भर समुद्रातील बोट ॲम्ब्युलन्सचा अभ्यास करुन त्यातील उणीवा दुर करुन त्याप्रमाणे निविदा मागविण्याची जबाबदारी प्रकल्प संचालकांची राहील.

३. उपरोक्त अनुक्रमांक १ ते १५ येथील अटींची पूर्तता व खरेदी नियमानुसार व आवश्यकतेनुसार आहे हे सुनिश्चित करण्याची जबाबदारी आयुक्त आरोग्यसेवा तथा अभियान संचालक राष्ट्रीय आरोग्य अभियान,मुंबई व सम्बन्धित कार्यक्रम प्रमुख यांची राहील.

४. शासन निर्णय,वित्त विभाग,क्र.विअप्र २०१३/प्र.क्र.३०/भाग-२/२०१३/विनिमय,दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८,भाग पहिला,उपविभाग-२ मधील अ.क्र.४,नियम क्र.७ अन्वये अवजारे,किरकोळ साधन सामुग्री आणि उपक्रम संच विकत घेण्यास मंजुरी देण्यासाठी प्रशासनिक विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००८०७१७४३०३२३१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Milind Raghunath Kulkarni

Digitally signed by Milind Raghunath Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=438fa70bb728385b5c81bde24450c11d5ce0d99ed18a61fb5b1685722e2c2c03, cn=Milind Raghunath Kulkarni
Date: 2020.08.07 18:05:13 +05'30'

**( मिलिंद कुळकर्णी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत:-

१. आयुक्त,आरोग्य सेवा तथा अभियान संचालक,राष्ट्रीय आरोग्य अभियान संचालक, मुंबई,
२. प्रकल्प संचालक (EMS),राष्ट्रीय आरोग्य अभियान,मुंबई.
३. संचालक,आरोग्यसेवा,मुंबई,
४. संचालक (वित्त व लेखा ),राष्ट्रीय आरोग्य अभियान,मुंबई,
५. अतिरिक्त संचालक,राज्य कुटुंब कल्याण कार्यालय,पुणे,
६. सर्व सहसंचालक ( आरोग्य सेवा आयुक्तालयामार्फत )
७. उपसंचालक,सर्व मंडळ कार्यालये,
८. सर्व सर्व जिल्हा शल्य चिकित्सक (FWB मार्फत)
९. जिल्हा आरोग्य अधिकारी (FWB मार्फत)
१०. निवड नस्ती (कार्यासन-आरोग्य-७).